<u>निवडसूची सन-२०१७-२०१८</u>
उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ संवर्गामध्ये तदर्थ पदोन्नतीने <u>पदस्थापना देण्याबाबत.........</u>

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : आस्था-२०१८/प्र.क्र.२६/ई-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ०५ नोव्हेंबर, २०२०

<u>वाचा</u>: १) महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५, दिनांक २८.०४.२०१५, दिनांक १६.०७.२०१५ आणि दिनांक १५.०६.२०१७ च्या अधिसूचना.
२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/श्री. कुलकर्णी/प्र.क्र.३७/२०१८/आ-१, दिनांक २८.०१.२०१९
३) शासन आदेश, समक्रमांक, दिनांक ०९.०९.२०२०

<u>प्रस्तावना :-</u>

भूमि अभिलेख विभागातील श्री. अजय कुलकर्णी, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, यांनी निवडसूची वर्ष सन २०१७-१८ मधून उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामध्ये पदोन्नती देण्याची विनंती केली होती. तथापि, सदर पदोन्नतीवेळी विचारक्षेत्रात असलेले श्री. अजय कुलकर्णी, जिल्हा अधीक्षक भूमी अभिलेख यांच्याविरुद्ध विभागीय चौकशी सुरु असल्याने त्यांचे प्रकरण मोहोरबंद ठेवण्यात आले होते. तदनंतर श्री. अजय कुलकर्णी यांच्यावर सुरु असलेल्या विभागीय चौकशीअंती त्यांना **“सक्त ताकीद”** देवून प्रकरण निकाली काढण्यात आले. सदर वस्तुस्थिती विचारात घेवून वाचा क्र.२ वरील पत्रान्वये श्री. अजय कुलकर्णी, जिल्हा अधीक्षक भूमी अभिलेख यांच्याविरुद्ध विभागीय चौकशी सुरु अथवा अंमलात नसल्याने त्यांना उपसंचालक भूमी अभिलेख या पदावर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही २०१५/प्र.क्र. ३१०/कार्या १२ दि.१५.१२.२०१७ मधील तरतूदीनुसार मोहोरबंद पाकीट ठेवलेल्या प्रकरणाचे पुनर्विलोकन करण्याची विनंती शासनास करण्यात आली. सबब, श्री. अजय कुलकर्णी यांचे मोहोरबंद असलेले प्रकरण उघडून त्यातील निष्कर्षानुसार ते निवडसूची वर्ष सन २०१७-१८ मधून पदोन्नतीसाठी पात्र ठरल्याचे दिसून आले. तदनुसार शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार वाचा क्र. ३ अन्वये श्री. अजय कुलकर्णी यांना सदर संवर्गात पदोन्नती देण्यात आली आहे. सबब, श्री. अजय कुलकर्णी यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

<u>शासन आदेश</u> :-

भूमि अभिलेख विभागातील जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामधून उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ संवर्गामध्ये पदोन्नती देण्यासाठी शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २०१७/ प्र.क्र. ३१२A/१६ ब दिनांक २९.१२.२०१७ च्या पत्रातील सुचनांनुसार निवडसूची सन २०१७-२०१८ मधून श्री. अजय कुलकर्णी (ज्येष्ठता क्रमांक २०) यांना उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ [वेतन श्रेणी रु.१५६००-

३९१००/-, (ग्रे.पे.रु.६६००/-)], (सातव्या वेतन आयोगानुसार, S-२३, ६७७००-२०८७००) या संवर्गामध्ये स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिका-याचे नाव व पदनाम | पदोन्नतीने पदस्थापना केलेले पद | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री. अजय कुलकर्णी, उप संचालक भूमि अभिलेख | उप संचालक भूमि अभिलेख, नाशिक प्रदेश, नाशिक | रिक्त पदावर |

२. वर नमूद अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

अ) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र. २७९७/२०१५ महाराष्ट्र राज्य विरुद्ध श्री. विजय घोगरे व इतर संलग्न न्यायालयीन प्रकरणांत दिनांक ०४.०८.२०१७ रोजी अंतिम निर्णय दिलेला असून या विरुद्ध शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधिन राहून सदर अधिका-यांना उप संचालक भूमि अभिलेख गट-अ संवर्गामध्ये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहेत.

ब) सदर पदोन्त्ती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

क) या पदावर देण्यात आलेली पदोन्नती (निवडसूची) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमीत केल्या नंतरच सदर पदावर सेवा ज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पदोन्नत अधिकारी पात्र ठरतील.

ड) त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्व सुचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहेत.

इ) सदर पदोन्नत अधिका-यांनी एक महिन्याच्या कालावधीत नियुक्तीच्या पदावर हजर होणे आवश्यक राहील. जे अधिकारी विहीत मुदतीत नियुक्तीच्या पदावर हजर होणार नाहीत, तर ते त्यांची सेवाज्येष्ठता गमावतील.

३. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना, “महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम,२०१५” दिनांक २८ एप्रिल,२०१५ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणांमधील तरतुदीनुसार महसूली विभाग वाटप करण्यात आलेले आहे.

४. पदोन्नती झालेल्या अधिकाऱ्यांनी उप संचालक भूमी अभिलेख, गट-अ या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यानंतर त्या अधिकाऱ्यांची शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमानुसार वेतननिश्चिती करावी.

५. संबंधीत वरिष्ठ अधिकाऱ्यांनी वरील पदोन्नत अधिकाऱ्यांना, पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधीत अधिकाऱ्यांना नविन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी मुळ कार्यालयाने कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले, आणि ते नविन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास अवगत करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२०११०५१५४१४६५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH HARIDASRAO BHOGLE

Digitally signed by SANTOSH HARIDASRAO BHOGLE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=SANTOSH HARIDASRAO BHOGLE
Date: 2020.11.05 15:44:49 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) उप संचालक भूमि अभिलेख, संलग्न जमाबंदी आयुक्त कार्यालय, पुणे.(सर्वसाधारण/ भूमापन/ एकत्रिकरण/नागरी भूमापन) (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख म.रा., पुणे)
३) उप संचालक भूमि अभिलेख, नाशिक प्रदेश, नाशिक (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, म.रा., पुणे)
४) संबंधीत अधिकारी (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, म.रा., पुणे)

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
३) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
५) कार्यासन अधिकारी, कार्यासन-१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
६) निवडनस्ती / कार्यासन ई-६.